201502041244583927

सुलतानगादे लघु पाटबंधारे तलाव,
ता.खानापूर जि.सांगली योजनेस,
सुधारित प्रशासकीय मान्यता
प्रदान करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग
शासन निर्णय क्र. सुप्रमा १०१०/(५२/२०१०) ल.पा.१
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
*दिनांक :- २९ ऑक्टोबर, २०१०*

**पहावे** : कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे यांचे जा.क्र.मकृखोविम/ २१०/(८/२०१०)/लपा-२/१०२६, दि.१५.०२.२०१० चे पत्र

**प्रस्तावना :**

सांगली जिल्ह्यातील सुलतानगादे लघु पाटबंधारे तलावास महामंडळ निर्णय क्रमांक मकृखोविम २००/(१०९७/२०००)/प्रमा/लपा-२/५३४१ दिनांक १४.०७.२००४ अन्वये रु.२,३४,४६,६१६/- इतक्या रकमेस प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यांत आली होती. तदनंतर माहे जून,२००५ मध्ये योजनेच्या कामास प्रत्यक्ष सुरुवात झाली. परंतू भुसंपदान प्रक्रीयेमूळे काम बंद ठेवण्यांत आले होते व माहे ऑगस्ट, २००८ मध्ये कामास पुनःसुरुवात करण्यांत आली असून सद्यस्थितीत काम प्रगतीपथावर आहे.

प्रकल्पाचे काम सुरु असतांना दरसूचीच्या दरातील वाढ, संकल्पनातील बदल, भूसंपादन किंमतीतील वाढ व इतर कारणांमुळे किंमतीत झालेल्या वाढीमुळे सन २००८-०९ ची दरसुची वापरुन सुधारित अंदाजपत्रक तयार करुन रु ४०३.३७ लक्ष किमतीस सुधारित प्रशासकीय मान्यता मिळणे बाबतचा प्रस्ताव कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे यांचे कडून शासनास प्राप्त झाला होता व तो शासनाच्या विचाराधिन होता. सदर प्रस्तावासंदर्भात शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय**

१) सांगली जिल्ह्यातील सुलतानगादे लघु पाटबंधारे तलावास सन २००८-०९ ची दरसूचीवर आधारित केलेल्या सुधारित प्राक्कलनानुसार कामाच्या अंदाजित रु.४०३.३७ लक्ष *(रुपये चार कोटी तीन लक्ष सध्तीस हजार फक्त, त्यापैकी रु. ३७३.१५ लक्ष कामाप्रीत्यर्थ व रु.३०.२२ लक्ष अनुषंगिक खर्च)* रकमेस सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. अंदाजित किंमतीचा गोषवारा सोबत जोडलेल्या विवरणपत्रात देण्यात आला आहे.

२)  या योजनेच्या कामावरील खर्च मुख्य लेखाशिर्ष मागणी आय ५ "४७०२, लहान पाटबंधाऱ्यावरील भांडवली खर्च-१९०, सार्वजनिक क्षेत्र व इतर उपक्रमा यांतील गुंतवणुका (००)(०१) महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ भाग भांडवली अंशदान (योजनांतर्गत) (४७०२ ४७१४) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा व महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळाच्या मंजूर अनुदानातुन भागविण्यांत यावा.

जलसंपदा विभाग, शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण १०९९/(१२६/९९)/मो.प्र.(प्र.), दि.१८.५.९९ मधील तरतूदीनुसार व आंतरवित्त सल्लागार व सह सचिव यांच्या सहमतीने तसेच वित्त विभागाचे पत्र क्रमांक व्यअस-२०१०/प्र.क्र.८६/अर्थसंकल्प-२, दिनांक ११.१०.२०१० अन्वये व्यय अग्रक्रम समितीने दिलेल्या मंजूरीनुसार हा निर्णय निर्गमित करण्यांत येत आहे. सदर निर्णयास नियोजन विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र. ३२/१४३४ दि.१७.०७.२०१० आणि वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.२५२/व्यय-१२, दि.२६.०७.२०१० अन्वये सहमती प्राप्त झाली आहे. या योजनेस प्रदान केलेली सुधारित प्रशासकीय मान्यता अ.क्र. ४६ /२०१० वर नोंदविण्यांत आलेली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने

( मिलींद हरदास )
शासनाचे कार्यासन अधिकारी

प्रत अंदाजित किंमतीच्या गोषवाऱ्यासह :-

महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे
मुख्य अभियंता (ज.सं.), जलसंपदा विभाग, पुणे
आंतर वित्त सल्लागार व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
अधीक्षक अभियंता, सांगली पाटबंधारे मंडळ, सांगली
कार्यकारी अभियंता, लघु पाबंधारे विभाग, सांगली
उपसचिव (लपा)/अवर सचिव(लपा)/उपअभियंता(लपा-१), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
कार्यासन अर्थ १-२ (२ प्रती), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
जिल्हाधिकारी सांगली, सांगली
स्वीय सहायक, मा.मंत्री, जलसंपदा (कृष्णा खोरे विकास महामंडळ), मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक, मा.राज्यमंत्री, जलसंपदा, मंत्रालय, मुंबई
विभागीय संपर्क अधिकारी, माहिती व जनसंपर्क, महासंचालक, मंत्रालय, मुंबई
ल.पा.१ कार्यासन संग्रहार्थ

(शासन निर्णय, जलसंपदा विभाग, क्र सुप्रमा १०१०/(५२/२०१०) ल.पा.१, दि. २९ ऑक्टोबर,२०१० चे सहपत्र)

## विवरण पत्र

सुलतानगादे लघु पाटबंधारे तलाव, ता.खानापूर जि.सांगली

अंदाजित किंमतीचा गोषवारा

| अ.क्र. | उपशिर्ष | किंमत (रु. लक्ष) |
|---|---|---|
| १. | अ - प्राथमिक | ३.४७ |
| २. | ब - भु संपादन | ७०.९२ |
| ३. | सी - काम | २४८.०० |
| ४. | के - इमारत | ०.२५ |
| ५. | एम - वृक्षारोपण | ०.०१ |
| ६. | ओ - संकीर्ण | ०.१२ |
| ७. | पी - देखभाल | ०.४३ |
| ८. | आर - दळणवळण | ०.०७ |
| ९. | भाववाढ | ४९.८८ |
| | एकूण | ३७३.१५ |
| १०. | इ.टी.पी (१० %) | ३०.२२ |
| | एकूण | ४०३.३७ |

### ठळक वैशिष्टे

१. योजनेची सिंचन क्षमता - २५६ हेक्टर

२. नियोजित पाणी साठा - ११३५.९२ स.घ.मी.

३. पाणी साठ्याची प्रती स.घ.मी किंमत - रु. ३५५१०/-स.घ.मी.>मापदंड २२५३९/ स.घ.मी.

४. लाभव्यय गुणोत्तर - २.२१ > १.००